**श्री.अजय राजाराम शिंदे यांना पोलीस उपनिरीक्षक पदावर पुर्ननियुक्ती करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पीएमएन-०२१३/१०५१/प्र.क्र.१८५/पोल-५ब

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : १७ एप्रिल, २०१७

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांकः आरईएन-०३१२/प्र.क्र.११५/पुनर्बांधणी-१६/पोल-५ब, दिनांक १२ नोव्हेंबर २०१२
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दिनांक २ डिसेंबर १९९७
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२००५/प्र.क्र.४७/०५/१२, दिनांक २५ ऑगस्ट २००५
४) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पोलीस पत्रक परिच्छेद क्रमांक-२०३/भाग-३, दिनांक १४ मे २००७
५) पोलीस महासंचालक, मुंबई यांचे आदेश क्रमांक-पोमसं/५/१०/पुनर्नियुक्ती-शिंदे/४५/२०१२, दिनांक ३ डिसेंबर २०१२
६) पोलीस महासंचालक, मुंबई यांचे आदेश क्रमांक-पोमसं/५/१०/पुनर्नियुक्ती-शिंदे/४५/२०१२, दिनांक ४ जानेवारी २०१३
७) पोलीस महासंचालक, मुंबई यांचे आदेश क्रमांक-पोमसं/४/१०/७/पदोन्नती-शिंदे/११/२०१३, दिनांक २६ फेब्रुवारी २०१३
८) पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्रमांक-पोमसं/४/७/१०/मा.ता.(शिंदे)/११/२०१३, दिनांक ९ एप्रिल २०१३

<u>प्रस्तावना</u>

श्री.अजय राजाराम शिंदे यांची दिनांक १५ सप्टेंबर १९९३ रोजी सरळसेवेने पोलीस दलात पोलीस उपनिरीक्षक पदी नेमणूक झाली होती. पोलीस प्रशिक्षणानंतर त्यांची बृहन्मुंबई पोलीस दलात नियुक्ती करण्यात आली. श्री.अजय शिंदे यांनी दिनांक १४ मे २००७ रोजी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्याकडे कौटुंबिक अडचणीच्या पार्श्वभूमीवर पोलीस उपनिरीक्षक पदाचा दिलेला राजीनामा पोलीस आयुक्तांनी स्वीकारला होता.

२. श्री.अजय शिंदे यांच्या विनंतीनुसार त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम-४६(४)(सी) च्या तरतुदी नियम-४ नुसार शिथील करुन शासन सेवेत पुन:स्थापित करण्यास व नियम-४६(६) नुसार त्यांचा सेवाखंड क्षमापित करण्यास शासनाने मान्यता दिली. त्यानुसार गृह विभागाच्या दिनांक १२ नोव्हेंबर २०१२ च्या शासन निर्णयान्वये श्री.अजय शिंदे यांनी वेतनश्रेणीच्या ज्या टप्प्यावर राजीनामा दिला होता, त्या टप्प्यावर त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याचे तसेच सेवेतून कार्यमुक्त केल्यापासून पुन्हा सेवेचा कार्यभार घेईपर्यंतचा त्यांचा सेवाखंडित कालावधी क्षमापित करण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले.

३. पोलीस महासंचालक, मुंबई या कार्यालयाने दिनांक ३ डिसेंबर २०१२ च्या कार्यालयीन आदेशान्वये श्री.अजय शिंदे यांना पुन:स्थापनेनंतर राज्य गुप्तवार्ता विभागात रिक्त असलेल्या पदावर नेमणूक केली. त्यांनी सदर पदाचा दिनांक ४ डिसेंबर २०१२ रोजी कार्यभार स्वीकारला. त्यानंतर श्री.अजय शिंदे यांची सदर कार्यालयाच्या दिनांक ४ जानेवारी २०१३ च्या आदेशान्वये पोलीस उपनिरीक्षकांच्या दिनांक १ जानेवारी २०१२ ची स्थिती दर्शविणाऱ्या मूळ ज्येष्ठता यादीवर अ.क्र.५८ए येथे ज्येष्ठता निश्चित करण्यात आली. तसेच दिनांक २६ फेब्रुवारी २०१३ च्या आदेशान्वये त्यांना सहायक पोलीस निरीक्षक पदावर स्थानापन्न व तात्पुरती पदोन्नती देण्यात येऊन, त्यांची राज्य गुप्तवार्ता विभागात रिक्त पदी नियुक्ती करण्यात आली. त्यांनी दिनांक ६ मार्च २०१३ रोजी सहायक पोलीस निरीक्षक पदाचा कार्यभार स्वीकारला.

४. श्री.अजय शिंदे यांनी पदोन्नतीनंतर दिनांक ११ मार्च २०१३ च्या अर्जान्वये सेवा ज्येष्ठतेनुसार सहायक पोलीस निरीक्षक पदाचा मानीव दिनांक मंजूर करण्याची पोलीस महासंचालकांकडे विनंती केली. पोलीस महासंचालकांनी त्यांच्या मानीव दिनांकाचा प्रस्ताव दिनांक ९ एप्रिल २०१३ च्या पत्रान्वये शासनाच्या मंजुरीसाठी सादर केला. सदर प्रस्तावाच्या छाननीअंती श्री.अजय शिंदे यांना सेवेत पुन:स्थापित करण्यापासून त्यांना पदोन्नती देण्यात येईपर्यंत चुकीची कार्यवाही झाल्याच्या खालील बाबी निदर्शनास आल्या आहेत...

१. श्री.अजय शिंदे यांना त्यांनी वेतनश्रेणीच्या ज्या टप्प्यावर राजीनामा दिला होता, त्या टप्प्यावर त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले आहे. हे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम-४६(१) च्या तरतुदीनुसार एखाद्या सेवेचा किंवा पदाचा राजीनामा दिल्यामुळे पूर्वीच्या सेवेचा हक्क गमावला जातो. या तरतुदीनुसार राजीनामा दिल्यास पूर्वीच्या सेवेवर निवृत्तीवेतन अनुज्ञेय नाही, असा निर्णय मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सी.डी.मोरे यांच्या याचिका क्रमांक-२७१३/२००० मध्ये दिनांक ३ जुलै २००० रोजी दिला आहे.

२. भारतीय संविधानाच्या अनुच्छेद-३०९ मध्ये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन, दिनांक १ नोव्हेंबर २००५ पासून रद्द केलेली महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ आणि या नियमातील कायदेशीर तरतूद व त्यावरील मा.उच्च न्यायालयाचा निर्णय विचारात घेता, श्री.अजय शिंदे हे निवृत्तीवेतनासाठी पात्र नाहीत.

३. तसेच त्यांना सेवेतून कार्यमुक्त केल्यापासून पुन्हा सेवेचा कार्यभार घेईपर्यंतचा त्यांचा सेवाखंडित कालावधी क्षमापित करुन तो अर्हताकारी सेवा म्हणून हिशोबात घेण्यात आला आहे. हे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम-४६(६) च्या तरतुदीनुसार अनुज्ञेय नाही.

४. श्री.अजय शिंदे यांची पोलीस उपनिरीक्षक पदावरील मूळ ज्येष्ठता अबाधित ठेवण्यात आली असून त्या आधारे त्यांना सहायक पोलीस निरीक्षक पदी पदोन्नती देण्यात आली आहे. हे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ४६(१) च्या तरतुदीनुसार अनुज्ञेय नाही.

५. निवृत्तीवेतन नियमानुसार विशेष बाब म्हणून सेवेतील खंड क्षमापित करुन पूर्वीची सेवा निवृत्तीवेतनार्थ ग्राहय धरुन पुनर्नियुक्ती करण्यास मान्यता देण्याच्या निर्णयाच्या आधारे श्री.अजय शिंदे यांना वेतनाचे इतर लाभ उदाहरणार्थ वेतन संरक्षण, ज्येष्ठता, मानीव दिनांक इत्यादी अनुज्ञेय नाहीत.

५. वरील सर्व बाबी विचारात घेता, गृह विभागाचा दिनांक १२ नोव्हेंबर २०१२ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शासन निर्णय, गृह विभाग दिनांक १२.११.२०१२ अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. श्री.अजय राजाराम शिंदे यांची दिनांक १५ सप्टेंबर १९९३ रोजी सरळसेवेने पोलीस दलात पोलीस उपनिरीक्षक पदी नेमणूक झाली होती. पोलीस प्रशिक्षणानंतर त्यांची बृहन्मुंबई पोलीस दलात नियुक्ती करण्यात आली होती. श्री.अजय शिंदे यांनी दिनांक १४ मे २००७ रोजी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्याकडे कौटुंबिक अडचणीच्या पार्श्वभूमीवर पोलीस उपनिरीक्षक पदाचा दिलेला राजीनामा पोलीस आयुक्तांनी स्वीकारला होता. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम-४६(४)(सी) मधील तरतुदी शिथील करुन, एक विशेष बाब म्हणून श्री.अजय शिंदे यांनी मूळ संवर्गात पोलीस उपनिरीक्षक पदी दिनांक ४ डिसेंबर, २०१२ रोजी कार्यभार स्विकारला असल्याने, दिनांक ४ डिसेंबर, २०१२ रोजी खालील अटींच्या अधीन राहून दिनांक १२ नोव्हेंबर, २०१२ रोजी पुनर्नियुक्ती करण्यात येत आहे.

१. श्री.अजय शिंदे यांची पुर्ननियुक्तीनंतरची पोलीस उपनिरीक्षक या पदावरील नियुक्ती सेवा ज्येष्ठतेच्या प्रयोजनार्थ नवीन नियुक्ती असेल. त्यांना पूर्वीच्या सेवेचा सेवा ज्येष्ठतेचा कोणताही लाभ अनुज्ञेय असणार नाही. त्यांची पुनर्नियुक्ती शुन्य ज्येष्ठतेवर व पोलीस उपनिरीक्षक पदास विहित केलेल्या वेतनसंरचनेतील किमान वेतनावर निश्चित करण्यात येत आहे.

२. श्री.अजय शिंदे यांचा राजीनामा अंमलात येण्याची तारीख आणि राजीनामा मागे घेण्यास परवानगी दिल्यामुळे ते कामावर रुजू होण्याची तारीख या दरम्यानचा कामावरील अनुपस्थितीचा कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम-४६(६) नुसार क्षमापित करण्यात येत असून, सदरहू खंडित कालावधी व त्यापूर्वीचा सेवा कालावधी हा कोणत्याही सेवा विषयक प्रयोजनार्थ अर्हताकारी सेवा म्हणून हिशोबात घेतला जाणार नाही.

३. श्री.अजय शिंदे यांनी दिनांक १४ मे २००७ रोजी वैयक्तिक कारणासाठी राजीनामा दिला असल्यामुळे, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम-४६(१) नुसार त्यांनी त्यांच्या पूर्वीच्या सेवेवरील हक्क गमावला आहे. त्यामुळे ते पुनर्नियुक्ती झाल्यानंतर प्रत्यक्ष रुजू होईपर्यंतच्या म्हणजेच दिनांक १५ सप्टेंबर १९९३ ते ३ डिसेंबर २०१२ च्या सेवेवर त्यांना कोणतेही लाभ अनुज्ञेय ठरणार नाहीत.

३. श्री.अजय शिंदे यांच्या ज्येष्ठता व पदोन्नतीचे अनुक्रमे दिनांक ४ जानेवारी २०१३ व २६ फेब्रुवारी २०१३ रोजीचे आदेश पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी तात्काळ रद्द करण्याची कार्यवाही करावी. तसेच श्री.अजय शिंदे यांच्या वेतन, ज्येष्ठता इत्यादी प्रकरणी खालील सूचनांचे पालन करण्यात यावे व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

i. श्री.अजय शिंदे यांचे वेतन, ते पुनर्नियुक्तीनंतर शासनाच्या सेवेत रुजू झाल्याच्या दिनांकापासून सहाव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने पोलीस उपनिरीक्षक पदास विहित केलेल्या वेतन संरचनेतील किमान वेतनावर व शुन्य ज्येष्ठतेवर निश्चित करण्यात यावे. अतिरिक्त प्रदानाची वसुली करण्यात यावी.

ii. श्री. शिंदे यांना पूर्वीच्या सेवेचे कोणतेही लाभ जसे वेतन संरक्षण, वेतनवाढी, रजा सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना, जुने निवृत्तीवेतन नियम अनुज्ञेय राहणार नाहीत.

iii. श्री.शिंदे यांना पुनर्नियुक्तीच्या दिनांकापासून परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू राहिल. त्यानुसार त्यांचे या योजनेचे खाते उघडणे, त्यांच्या वेतनातून अंशदान जमा करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

iv. श्री. शिंदे यांचे भविष्य निर्वाह निधी खाते असल्यास, विहित कार्यपद्धती अवलंबून ते बंद करण्यात यावे. त्यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या खात्यावर भविष्य निर्वाह निधीच्या दराप्रमाणे व्याज मिळणार असल्यामुळे त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यावर व्याज देण्यात आले असल्यास ते शासनाकडे जमा करण्याची कार्यवाही करावी.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-२९७/१४/सेवा-७, दिनांक ११ सप्टेंबर २०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीने विधी व न्याय विभाग व सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१८१५५४०६६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh M. Khade

Digitally signed by Suresh M. Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4b9c3bfe0cf5832f9fb73e937c85fff475ad0238a20da77ce26bb6669f386614, cn=Suresh M. Khade
Date: 2017.04.18 16:35:47 +05'30'

**( सुरेश खाडे )**

उप सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, विधी व न्याय, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. श्री.अजय राजाराम शिंदे, ९४/II, अर्जुन कॉपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी लिमिटेड, गोदरेज गार्डन इन्क्लेव्ह, फिरोजशा नगर, विक्रोळी (पूर्व), मुंबई.
१०. निवड नस्ती, पोल-५ब